बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ अनुसार उच्च प्राथमिक शाळांमध्ये नैसर्गिक वाढीने इयत्ता ८ वी चे वर्ग सुरु करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०१३/प्र.क्र.२०० /का.११

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २१ जुलै, २०१४

**वाचा -**

१) **बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९** (Right of the Children to free and compulsory Education, Act २००९-No.३५,२००९
२) **शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र.प्राशातु १११२/(२५८/२०१३)/ प्राशि-३, दि.१३ फेब्रुवारी, २०१३.**
३) **शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०१३/प्र.क्र.२००(अ) /का.११दि. ०३ आक्टोबर, २०१३.**
४) **शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र.प्राशातु १११२/(२५८/२०१३)/ प्राशि-३, दि.०२ जूलै, २०१३.**
५) **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.विभशा २०१३/(प्र.क्र १७२)/विजाभज-२, दि.१९/०७/२०१४.**

**प्रस्तावना -**

राज्यात शासकीय, स्थानिक स्वराज्य संस्था, खाजगी मान्यता प्राप्त शैक्षणिक संस्था यांचेमार्फत प्राथमिक व माध्यमिक शिक्षण शिकवले जात आहे. सध्या राज्यात १ ली ते १२ वी पर्यंत दिल्या जाणा-या शिक्षणाला वेगवेगळया परिस्थितीमध्ये खालील दर्शविल्याप्रमाणे प्राथमिक, उच्च माध्यमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक संबोधण्यात येते :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | इ.१ ली ते ४ थी चे वर्ग असणारी शाळा | -- | प्राथमिक |
| (२) | इ.१ ली ते ७ वी चे वर्ग असणारी शाळा | -- | उच्च प्राथमिक |
| (३) | इ.१ ली ते १० वी चे वर्ग असणारी शाळा | -- | माध्यमिक |
| (४) | इ.१ ली ते १२ वी चे वर्ग असणारी शाळा | -- | उच्च माध्यमिक |
| (५) | इ.५ वी ते १० वी चे वर्ग असणारी शाळा | -- | माध्यमिक |
| (६) | इ.५ वी ते १२ वी चे वर्ग असणारी शाळा | -- | उच्च माध्यमिक |
| (७) | इ.८ वी ते १० वी चे वर्ग असणारी शाळा | -- | माध्यमिक |
| (८) | इ.८ वी ते १२ वी चे वर्ग असणारी शाळा | -- | उच्च माध्यमिक |

२. सन २००२ मध्ये भारतीय घटनेत दुरुस्ती करुन ६ ते १४ वर्षे वयोगटातील सर्व बालकांना मोफत व सक्तीचे प्राथमिक शिक्षण (इ. १ ली ते ८ वी ) घेणे हा त्यांचा मुलभूत अधिकार करण्यात आला आहे. त्या

अनुषंगाने केंद्र शासनाने बालकांना मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ हा कायदा पारीत केला असून त्याची अंमलबावणी दि.१ एप्रिल, २०१० पासून सुरु झालेली आहे. या अधिनियमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्य शासनाने बालकांना मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ नियम अधिसुचित केलेले आहेत.

३. बालकांना मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतूद लक्षात घेता शासनाने दि. १३ फेब्रुवारी, २०१३ च्या शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्राथमिक शिक्षणाची व्याख्या व त्यामध्ये सुधारणा केलेली असून त्यानुसार राज्यात इयत्ता १ ली ते ८ वी पर्यंत प्राथमिक शिक्षण दिले जाणार असून त्यास पुढीलप्रमाणे संबोधण्यात आले आहे :-

इयत्ता १ ली ते ५ वी पर्यंतचे शिक्षण -- प्राथमिक शिक्षण

इयत्ता ६ वी ते ८ वी पर्यंतचे शिक्षण -- उच्च प्राथमिक शिक्षण

४. आदिवासी विकास विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, केंद्रीय आश्रमशाळा व एकलव्य रेसिडेंशियल स्कूलसाठी बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतूद लक्षात घेता प्रत्येक ठिकाणी प्राथमिक शिक्षण (इयत्ता १ ली ते ८ वी ) उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. त्यामुळे अशा शाळांमध्ये खालीलप्रमाणे वर्ग देणे अपेक्षित आहे.

| अ.क्र | खालील वर्ग असलेल्या आश्रमशाळांबाबत | खालील वर्ग असलेल्या आश्रमशाळांबाबत |
|---|---|---|
| २ | १ ली ते ७ वी | इयत्ता ८वी चा वर्ग द्यावा लागेल |
| ३ | १ ली ते १० वी | कोणताही वर्ग देय नाही. |
| | | |

५. वरील वस्तुस्थिती विचारात घेता आदिवासी विकास विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा यासाठी इयत्ता १ ली ते ८ वी च्या प्रत्येक वर्गातील निवासी व अनिवासी विद्यार्थ्यांसाठी शिक्षक गुणोत्तर प्रमाण हे बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ चे परिशिष्टामध्ये नमूद केल्याप्रमाणे असणे आवश्यक आहे. आदिवासी विकास विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, केंद्रीय आश्रमशाळा व एकलव्य रेसिडेंशियल स्कूलसाठी आवश्यकतेनुसार इयत्ता ८ वी चा वर्ग सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या उक्त संदर्भ क्र.४ मधील दिनांक ०२/०७/२०१३ च्या शासन निर्णयाच्या धर्तीवर आदिवासी विकास विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, केंद्रीय आश्रमशाळा व एकलव्य रेसिडेंशियल स्कूल या निवासी शाळांमध्ये आवश्यकतेनुसार अनुक्रमे इयत्ता ८ वी चा वर्ग पुढे नमूद केलेल्या कार्यपध्दतीने सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(अ) पुर्वीच्या प्राथमिक शिक्षणाच्या व्याख्येप्रमाणे एखाद्या ठिकाणी ज्या आश्रमशाळा इयत्ता १ ली ते ७ वी सुरु आहेत व त्या शाळांमध्ये अनुक्रमे इयत्ता ८ वी चा वर्ग ३ किलोमीटर अंतराच्या परिसरात उपलब्ध नाही अशा आश्रमशाळांमध्ये खालीलप्रमाणे वर्ग सुरु करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

१. ज्या ठिकाणी इयत्ता १ ली ते ७ वी पर्यंत आश्रमशाळा आहे व ३ किलोमीटर परिसरात अन्य शाळेत ८ वी चा वर्ग नाही, अशा आश्रमशाळांमध्ये इयत्ता ८ वी चा वर्ग देण्यात यावा.

२. ज्या ठिकाणी इयत्ता १ ली ते ७ वी पर्यंत आश्रमशाळा आहे व ३ किलोमीटर परिसरात अन्य शाळेत ८ वी चा वर्ग उपलब्ध आहे, अशा ठिकाणी आश्रमशाळांमध्ये इयत्ता ८ वी चा वर्ग देण्यात येऊ नये.

(ब) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी त्यांचे कार्यक्षेत्रातील सर्व आश्रमशाळांचा आढावा घेऊन जेथे अशा प्रकारचे वर्ग आवश्यक असतील त्याचा एक रीतसर संयुक्त प्रस्ताव शासनावर पडणा-या अतिरिक्त आर्थिक भारासह आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांचेमार्फत शासनाकडे पाठवावा.

(क) या शासन निर्णयाच्या अनुषंगाने ज्या अनुदानित आश्रमशाळांना इयत्ता ८ वी चा वर्ग सुरु करण्यास परवानगी देण्यात येणार आहे त्यानुषंगाने शासनाकडून देय असलेल्या अनुदानाकरिता वित्त विभागाकडून आवश्यक ती आर्थिक तरतूद उपलब्ध होईपर्यंत हे वर्ग विनाअनुदानित तत्त्वावर चालविणे आवश्यक राहील.

(ड) अप्पर आयुक्त (आ.वि) /प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी प्रस्तुत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर करताना त्यामध्ये अतिरिक्त घोषित केलेल्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांचे समायोजन करावे व आवश्यकता असल्यास नविन पदांचा प्रस्ताव शासनास सादर करावा. आपल्या स्तरावरून कोणत्याही आश्रमशाळांना नवीन पदांना मंजुरी देवू नये.

(इ) सर्व व्यवस्थापनाच्या प्राथमिक व उच्च प्राथमिक आश्रमशाळांना बालकांचा मोफत व सक्तीचे शिक्षणाचा अधिकार अधिनियम,२००९ मधील निकष व तरतुदीचे पालन करणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२११६१३११४०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2014.07.21 16:11:36 +05'30'

(अनिल कों आहिरे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मुंबई
३. मा.मंत्री, यांचे खाजगी सचिव,मुंबई (सर्व)
४. मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव,मुंबई
५. मा.राज्यमंत्री (आ. वि.) यांचे खाजगी सचिव,मुंबई
६. मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मुंबई(सर्व)
७. विधानमंडळाच्या सर्व समित्यांचे प्रमुख

८. मा.सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य विधान भवन, मुंबई
९. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
१०.मा.अप्पर मुख्य सचिव शालेय शिक्षण व क्रिडा विभाग
११.सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. मा.आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक
१३.मा.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
१४.अपर आयुक्त, आदिवासी विकास,
१५.प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१६.मा.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई
१७.सर्व जिल्हाधिकारी
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
१९. राज्य प्रकल्प संचालक महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,मुंबई
२०. शिक्षण संचालक (प्राथमिक)महाराष्ट्र राज्य,पुणे
२१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य,पुणे
२२. अध्यक्ष महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
२३. निवड नस्ती (का.११)